अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) यांनी सक्षम प्राधिकारी म्हणून दिलेल्या निर्णयाविरुध्द अपील प्रकरणाची सुनावणी घेण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. झोपुधो-१००१/प्र.क्र.२१७/२०१६/झोपसु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ जानेवारी, २०१७

<u>पहा :-</u> (१) क्रमांक झोपुयो.१००८/प्र.क्र.१४३(२)/झोपसु-१, दि.१३.०१.२०१४
(२) क्रमांक झोपयो. १२०३/प्र.क्र.६८/२०१६/झोपसु-१(१), दि.२७.०५.२०१६
(३) क्रमांक झोपयो. १२०३/प्र.क्र.६८/२०१६/झोपसु-१(२), दि.२७.०५.२०१६
(४) क्रमांक झोपुयो. १२०३/प्र.क्र.१८६/२०१६/झोपसु-१(१), दि.२३.०८.२०१६
(५) क्रमांक झोपुयो. १२०३/प्र.क्र.१८६/२०१६/झोपसु-१(२), दि.२३.०८.२०१६

<u>परिपत्रक</u>

महाराष्ट्र झोपडपट्टी क्षेत्र (सुधारणा, निर्मुलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ मध्ये सुधारणा करुन कलम ३५(१) मध्ये सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या कोणत्याही आदेशाविरुध्द अपिलीय प्राधिकाऱ्याकडे अपील करण्याची तसेच अपिलीय प्राधिकारी हा अपर जिल्हाधिकारी दर्जापेक्षा कमी नसावा, अशी तरतुद करण्यात आलेली आहे. महाराष्ट्र झोपडपट्टी क्षेत्र (सुधारणा, निर्मुलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ च्या कलम ३(१) व ३५(१) अन्वये बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रासाठी अनुक्रमे उपजिल्हाधिकारी (अति/निष्का) व सहाय्यक आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना सक्षम प्राधिकारी म्हणून आणि अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) यांना अपिलीय प्राधिकारी म्हणून घोषीत केले आहे.

अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) यांना अपिलीय प्राधिकारी म्हणून घोषीत करण्यापूर्वी ते उक्त अधिनियमाच्या कलम ३(१) अन्वये सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात आले होते. अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) यांनी सक्षम प्राधिकारी म्हणून दिलेल्या निर्णयाच्या विरुध्द आता पुन्हा त्यांच्याचकडे उक्त अधिनियमाच्या कलम ३५(१) अन्वये अपील दाखल होत असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे अशा प्रकरणात अपील प्रकरणे कोणी हाताळावीत या विषयी शासनास मार्गदर्शन करण्याची विनंती क्षेत्रीय कार्यालयाकडून करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन वर नमुद विशिष्ट प्रकरणात कोणी हाताळावीत याबाबत खालील सुचना देण्यात येत आहेत.

वर नमुद केल्याप्रमाणे महाराष्ट्र झोपडपट्टी अधिनियमामध्ये अपिलीय प्राधिकारी हा अपर जिल्हाधिकारी दर्जा पेक्षा कमी दर्जाचा नसावा, अशी तरतुद आहे. त्यास अनुसरुन बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) मुंबई शहर/ पश्चिम उपनगरे/ पूर्व उपनगरे यांनी यापूर्वी सक्षम प्राधिकारी म्हणून दिलेल्या निर्णयाच्या विरुध्द खालीलप्रमाणे सुनावणी घेवून आदेश पारीत करावेत.

१) ज्या प्रकरणांमध्ये अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) पश्चिम उपनगरे यांनी यापूर्वी सक्षम प्राधिकारी म्हणून निर्णय दिलेला असेल, त्यासंदर्भातील दाखल झालेल्या अपिलांची सुनावणी अपर जिल्हाधिकारी ( अति/निष्का) पूर्व उपनगरे यांनी घ्यावी.

२) ज्या प्रकरणांमध्ये अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) पूर्व उपनगरे यांनी यापूर्वी सक्षम प्राधिकारी म्हणून निर्णय दिलेला असेल, त्यासंदर्भातील दाखल झालेल्या अपिलांची सुनावणी अपर जिल्हाधिकारी ( अति/निष्का) पश्चिम उपनगरे यांनी घ्यावी.

३) ज्या प्रकरणांमध्ये अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) मुंबई शहर यांनी यापूर्वी सक्षम प्राधिकारी म्हणून निर्णय दिलेला असेल, त्यासंदर्भातील दाखल झालेल्या अपिलांची सुनावणी अपर जिल्हाधिकारी ( अति/निष्का) पश्चिम उपनगरे यांनी घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११७१६४४१५७००९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Govind Pathade

Digitally signed by Kishor Govind Pathade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kishor Govind Pathade
Date: 2017.01.17 16:48:39 +05'30'

**(कि.गो.पठाडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई- ३२.
३. मा.मंत्री (गृहनिर्माण)/ मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, गृहनिर्माण यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल, लेखापरीक्षा-१, महाराष्ट्र प्रतिष्ठा भवन, १०१,महर्षी कर्वे मार्ग,मुंबई-२०
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण,प्रशासकीय इमारत, अनंत काणेकर मार्ग, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१
७. आयुक्त, एम.एम.आर.डी.ए., ६ वा मजला, वांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१
८. उपाध्यक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई-५१
९. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, महापालिका कार्यालय, मुंबई- ४०० ००१.
१०. अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) तथा अपिलीय प्राधिकारी, मुंबई शहर, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई.
११. अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) पूर्व उपनगरे, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण इमारत, अनंत काणेकर मार्ग, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१.
१२. अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) पश्चिम उपनगरे, प्रशासकीय इमारत, ७ वा मजला, शासकीय वसाहत, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१३. उप जिल्हाधिकारी (अति/निष्का) तथा सक्षम प्राधिकारी, मुलुंड टोपीवाला कॉलेज बिल्डींग, तळमजला, एस.एन.रोड, मुलुंड (पश्चिम), मुंबई.
१४. उप जिल्हाधिकारी (अति/निष्का) तथा सक्षम प्राधिकारी, भांडूप, टोपीवाला कॉलेज बिल्डींग, तळमजला, एस.एन.रोड, मुलुंड (पश्चिम), मुंबई.

१५. उप जिल्हाधिकारी (अति/निष्का) तथा सक्षम प्राधिकारी, घाटकोपर, टोपीवाला कॉलेज बिल्डींग, तळमजला, एस.एन. रोड,मुलुंड (पश्चिम), मुंबई.
१६. उप जिल्हाधिकारी (अति/निष्का) तथा सक्षम प्राधिकारी, चेंबूर-१, डी.के.सांडू गार्डनजवळ, १० वा रस्ता, ॲक्सीस बँकेसमोर, चेंबूर, मुंबई - ४०० ०७१.
१७. उप जिल्हाधिकारी (अति/निष्का) तथा सक्षम प्राधिकारी, अंधेरी-१ , रुम नं. ६५ व ६६, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व) मुंबई- ५१.
१८. उप जिल्हाधिकारी (अति/निष्का) तथा सक्षम प्राधिकारी, बोरीवली-१, रुस्तमजी कॉम्प्लेक्स, महानगरपालिका मंडई इमारत, तळमजला, जयवंत सावंत रोड, दहिसर (पश्चिम) मुंबई- ४०० ०६८.
१९. उप जिल्हाधिकारी (अति/निष्का) तथा सक्षम प्राधिकारी, मालाड-१, एम.एच.बी. इमारत क्र.३८,पहिला मजला, सिध्दार्थनगर,एस.व्ही.रोड, गोरेगांव (पश्चिम), मुंबई- ४०० ०६२.
२०. निवासी उपजिल्हाधिकारी (अति/निष्का) पश्चिम उपनगर वांद्रे.
२१. उप जिल्हाधिकारी, सामान्य प्रशासन मुंबई उपनगर जिल्हा.
२२. उप विभागीय अधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा.
२३. विशेष भूसंपादन अधिकारी क्र.४, मुंबई उपनगर जिल्हा.
२४. अपर जिल्हा उप जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा.
२५. उप जिल्हाधिकारी (अपील), मुंबई उपनगर जिल्हा.
२६. उप जिल्हाधिकारी ( संजय गांधी योजना), मुंबई उपनगर जिल्हा.
२७. निवासी उपजिल्हाधिकारी (अतिक्रमण/निष्कासन) पूर्व उपनगरे
२८. निवासी उपजिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा.
२९. निवड नस्ती/ झोपसु-१